**जव्हार (जि.पालघर) या पर्यटन स्थळास 'ब' वर्ग पर्यटनस्थळाचा दर्जा देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीसी -२०१९/०७/प्र.क्र.४५१/ पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०६ नोव्हेंबर, २०२०.

संदर्भ :- १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०१०/८/ प्र.क्र.४६३/पर्यटन, दि.४/११/२०१०.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०११/१२/ प्र.क्र.८५५/पर्यटन, दि.१६/१/२०१२.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०१६/११/ प्र.क्र.८६२/पर्यटन, दि.२५/४/२०१७.
४) जिल्हा नियोजन अधिकारी, पालघर यांचे पत्र क्र. जिनिस/जिवायो/प्रा-पर्यटन/ २०१९-२०/१७३, दि.२९/१/२०२०.

**प्रस्तावना :**

जिल्ह्यातील 'ब' वर्ग पर्यटनस्थळांची निवड करुन प्रस्ताव शासनाला सादर करण्याबाबतचे अधिकार संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये, संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयामधील जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीस प्रदान करण्यात आले आहेत. तसेच राज्यातील 'ब' वर्ग पर्यटनस्थळे घोषित करण्यासाठी निकष व कार्यपध्दती संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे.

२. पालघर जिल्ह्यातील "जव्हार" हे पर्यटनस्थळ निसर्ग सौंदर्याने नटलेला परिसर असून "प्रतिमहाबळेश्वर" म्हणून प्रसिध्द आहे. जव्हार परिसर हा नैसर्गिक पर्यटनस्थळ असल्यामुळे सदर पर्यटनस्थळास प्रत्येक वर्षी सरासरी ५ ते ६ लक्ष पर्यटक भेट देत असतात. जव्हार पर्यटनस्थळ उंच पठारावर समुद्र सपाटीपासून सुमारे १७०० फुट उंचीवर वसलेले आहे. या ठिकाणी साधारणत: १२५ ते १५० मि.मी. पाऊस पडतो. त्यामुळे सदर ठिकाण थंड हवेचे ठिकाण म्हणूनही प्रसिध्द आहे.

३. जव्हार शहराला कला, संस्कृती, परंपरा व पराक्रमाचा समृध्द वारसा लाभलेला असून ते एक संस्थानकालीन ठिकाण आहे. या पर्यटनस्थळाच्या ठिकाणी व परिसरामध्ये जयविलास पॅलेस, शिरपामाळ, हनुमान पॉईंट, सनसेट पॉईंट, जुना राजवाडा, जयसागर धरण, विजयस्तंभ, दगडी बांधकाम असलेला सुर्य तलाव, जांभुळ विहिर, फिल्टर हाऊस इत्यादी प्रेक्षणीय स्थळे आहेत.

४. जिल्हाधिकारी, पालघर यांनी संदर्भ क्रमांक ४ येथील दि.**२९/१/२०२०** च्या पत्रान्वये **"जव्हार (जि.पालघर)" या पर्यटन स्थळास 'ब' वर्ग** पर्यटनस्थळाचा दर्जा देण्याची शिफारस केली आहे. त्यानुसार **जव्हार (जि.पालघर) या पर्यटन स्थळास 'ब' वर्ग** पर्यटनस्थळाचा दर्जा देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

**जव्हार (जि.पालघर) या पर्यटन स्थळास** दरवर्षी अंदाजे ५ ते ६ लक्ष पर्यटक भेट देतात. सदर पर्यटनस्थळाचे राज्यस्तरीय महत्व, या पर्यटन स्थळास भेट देणाऱ्या पर्यटकांची संख्या, ऐतिहासिक व भौगोलिक महत्व इत्यादी बाबी विचारात घेता, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस-२०१६/११/प्र.क्र.८६२/पर्यटन, दि.२५/४/२०१७ अन्वये राज्यातील 'ब' वर्ग पर्यटनस्थळे घोषित करण्यासाठी निश्चित करण्यात आलेल्या निकष व कार्यपध्दती नुसार **'जव्हार' (जि.पालघर) या पर्यटन स्थळास 'ब' वर्ग** पर्यटनस्थळ म्हणून घोषित करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०६१२५३५३३९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232b b3a3fcc8, serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300ef 79cfab47d9345, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2020.11.09 15:26:20 +05'30'

**(र. ज. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

| | |
|---|---|
| १) मा. राज्यपाल यांचे सचिव<br>२) मा. मुख्यमंत्राचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई<br>३) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.<br>४) सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई<br>५) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद<br>६) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा<br>७) सर्व मा. विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानपरिषद<br>८) सर्व मा. विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानसभा<br>९) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव<br>१०) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव<br>११) प्रधान सचिव (पर्यटन) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई. | १२) विभागीय आयुक्त, कोकण.<br>१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.<br>१४) संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.<br>१५) जिल्हाधिकारी, पालघर.<br>१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर<br>१७) अतिरिक्त जिल्हाधिकारी तथा जिल्हा पर्यटन समन्वय अधिकारी, पालघर<br>१८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>१९) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>२०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)<br>२१) जिल्हा नियोजन अधिकारी, पालघर<br>२२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाची सर्व कार्यासने<br>२३) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई<br>२४) निवड नस्ती, पर्यटन |

***